**गृहनिर्माण विभाग, मंत्रालय (खुद्द) आस्थापनेवरील अधिकारी / कर्मचाऱ्यांची वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे सेवेत राहण्यासाठी पात्र अपात्रता अजमावण्यासाठी विभागीय पुनर्विलोकन समितीची स्थापना करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन
## गृहनिर्माण विभाग
### शासन परिपत्रक क्रमांकः विपुस-२०१४/प्र.क्र.१३७/प्रशासन-१

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
४ था मजला, नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग,मुंबई ४०० ००१
तारीख: १० सप्टेंबर, २०१४.

वाचा

1) **शासन परिपत्रक क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरसो-१०८५/१०२९/४३/१५, दि.१२.५.१९८६.**
2) **शासन परिपत्रक क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र.विपुस-१०९२/प्र.क्र.२०/९२/१५, दि.१८.१०.१९९३**

## शासन परिपत्रक

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२ च्या नियम, १० (४) व ६५ च्या अनुषंगाने शासनाच्या सेवेतील गट-“अ” आणि गट-“ब” अधिकाऱ्यांची वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झाल्यावर सेवेत पुढे राहण्याची पात्र अपात्रता विहित निकषानुसार अजमावणे हे शासनाचे धोरण आहे. शासनाच्या सदरहू पुनर्विलोकन विषयक धोरणानुसार, गृहनिर्माण विभागातील पुनर्विलोकन आवश्यक झालेल्या गट-“अ” आणि गट-“ब” अधिकाऱ्यांची वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षाची सेवा झाल्यावर त्यांची सेवा पुढे चालू राहण्याबाबतची पात्र-अपात्रता अजमावून त्यांचे पुनर्विलोकन करुन योग्य ती शिफारस करण्यासाठी, सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ येथील शासन परिपत्रकानुसार पुढीलप्रमाणे पुनर्विलोकन समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | प्रधान सचिव ( गृहनिर्माण ) | = | अध्यक्ष |
| २) | सह सचिव | = | सदस्य |
| ३) | उप सचिव (प्रशासन) | = | सदस्य |
| ४) | अवर सचिव (प्रशासन) | = | सदस्य सचिव |

विभागात गट-“क” व गट-“ड” संवर्गातील कर्मचाऱ्यांना सेवातंर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्यासाठी खालीलप्रमाणे समिती अस्तित्वात आहे. तीच समिती सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन

क्र.२ येथील शासन परिपत्रकानुसार गट-“क” आणि गट-“ड” कर्मचाऱ्यांची वयाच्या ५५ व्या वर्षी त्यांची सेवेत पुढे राहण्याची पात्र-अपात्रता अजमावून त्यांचे पुनर्विलोकन करुन योग्य ती शिफारस करेल.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | सह सचिव (गृनिधो, इत्यादी.), गृहनिर्माण विभाग | = | अध्यक्ष |
| २) | उप सचिव (प्रशासन), गृहनिर्माण विभाग | = | सदस्य |
| ३) | अवर सचिव (अर्थ-१, गृनिधो, इत्यादी.),गृहनिर्माण विभाग | = | सदस्य |
| ४) | अवर सचिव (प्रशासन), गृहनिर्माण विभाग | = | सदस्य सचिव |

वरील दोनही समित्यांचे कामकाज शासनाने पुनर्विलोकनाबाबत विहित केलेल्या निकषांनुसार केले जाईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१०१२३३१७४१०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Salvi Rajaram Ganpat

Digitally signed by Salvi Rajaram Ganpat
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HSG, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Salvi Rajaram Ganpat
Date: 2014.09.10 12:30:19 +05'30'

**( रा.ग.साळवी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, (गृहनिर्माण), मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, गृहनिर्माण विभाग.
४. सह सचिव/उप सचिव/सर्व अवर सचिव, गृहनिर्माण विभाग.
५. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, (का-१५), मंत्रालय, मुंबई.
६. सर्व कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग.

यांना कळविण्यात येते की, सदरहू शासन परिपत्रक त्यांच्या अधिनस्त कार्यरत मंत्रालयीन सर्व कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणण्यात यावे.

७. निवडनस्ती, प्रशासन-१ गृहनिर्माण विभाग.